यशवंत पंचायत राज अभियान तथा
पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व
<u>प्रोत्साहन योजना सन २०१४-१५</u>
राज्यस्तरीय पडताळणी समिती स्थापन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः झेडपीए २०१३/ प्र.क्र. १४३/पंरा-१

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: १६ डिसेंबर,२०१४

<u>वाचा -</u>

१) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१३/ प्र.क्र. १४३/पंरा-१, दिनांक २३ सप्टेंबर, २०१३**
२) **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः झेडपीए २०१३/ प्र.क्र. १४३/पंरा-१,दिनांक ७ नोव्हेंबर, २०१३**
३) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१४/ प्र.क्र. ९१/पंरा-१,दिनांक २६ ऑगस्ट, २०१४**

<u>प्रस्तावना -</u>

राज्यात पंचायत राज संस्थांमधून प्रशासकीय व्यवस्थापन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५- २००६ या आर्थिक वर्षापासून विभाग व राज्य अशा दोन्ही स्तरांवर " यशवंत पंचायत राज अभियान" ही पुरस्कार योजना सुरु करण्यात आली आहे.

२. पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी पंचायत राज व्यवस्थेच्या सक्षमीकरणासाठी काम करणाऱ्या राज्यांना तसेच राज्यातील पंचायत राज संस्थांना प्रोत्साहन देण्यासाठी "पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व प्रोत्साहन योजना" (PEAIS) सुरु केली आहे. केंद्र शासनाने १२ व्या पंचवार्षिक योजनेत राबवित असलेल्या राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियानात या योजनेचा समावेश केला आहे. ग्राम विकास विभागाने सुरु केलेली "यशवंत पंचायत राज अभियान" व पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी सुरु केलेली "पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व प्रोत्साहन योजना" यांचा उद्देश एकच असल्याने या दोन्ही योजना सन २०११-१२ या वर्षापासून एकत्रित राबविण्यात येत आहेत. पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व प्रोत्साहन योजनेअंतर्गत राज्यातील एक जिल्हा परिषद, दोन पंचायत समित्या (त्यापैकी एक अनुसूचित क्षेत्रातील) व १४ ग्रामपंचायती (प्रत्येक विभागातील दोन व दोन अनुसूचित क्षेत्रातील) यांची शिफारस केंद्र शासनाकडे करावयाची आहे. तसेच यशवंत पंचायत राज अभियान अंतर्गत पुरस्कारासाठी पंचायत राज संस्थांची निवड करावयाची आहे. त्यासाठी ६ जिल्हा परिषदा (प्रत्येक विभागातून पहिली आलेली जिल्हा परिषद), ९ पंचायत समित्या

(प्रत्येक विभागातून पहिली आलेली पंचायत समिती अशा एकूण ६ आणि अनुसूचित क्षेत्रातील पहिल्या ३ पंचायत समित्या) आणि ४२ ग्रामपंचायती (प्रत्येक विभागातील पहिल्या ६ ग्रामपंचायती अशा एकूण ३६ आणि अनुसूचित क्षेत्रातील पहिल्या ६ ग्रामपंचायती) यांची प्रत्यक्ष क्षेत्रिय स्तरावर जाऊन पंचायत राज संस्थेने दिलेल्या माहितीची पडताळणी करावयाची आहे. त्या अनुषंगाने सन २०१३-१४ ची क्षेत्रिय स्तरावरील माहितीची पडताळणी करण्यासाठी राज्यस्तरीय पडताळणी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन परिपत्रक -

अतिरिक्त संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा यांनी दिनांक २४ नोव्हेंबर, २०१४ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे प्रमाणे यशवंत पंचायत राज अभियान तथा पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व प्रोत्साहन योजना सन २०१४-१५ अंतर्गत पडताळणी करण्यासाठी एकूण १० पडताळणी पथके तयार करण्यात आली असून प्रत्येक पडताळणी पथकात २ सदस्य आहेत. एका पंचायत राज संस्थेची पडताळणी २ दिवस पूर्णवेळ थांबून प्रत्यक्ष क्षेत्रिय स्तरावर भेटी देऊन पूर्ण करावयाचे आहे. यापैकी ७ पडताळणी पथके ग्रामपंचायतींची, २ पडताळणी पथके पंचायत समित्यांची आणि १ पडताळणी पथक जिल्हा परिषदांची तपासणी करणार आहेत. सदर पडताळणी पथकांची नावे व तपासणी करावयाच्या पंचायत राज संस्था खालीलप्रमाणे आहेत.

| अ.क्र. | **पडताळणी पथकातील सदस्यांची नाव** | **पडताळणी करावयाच्या पंचायत राज संस्था** |
|---|---|---|
| १ | १. बाळासाहेब जगताप, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (से. नि.)<br>२. श्री. अशोक राऊत, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, बुलढाणा | जिल्हा परिषद (प्रत्येक विभागातील पहिली) |
| २ | १. श्री. शांतीलाल मुंडे, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कसबा बावडा, कोल्हापूर<br>२. श्री. अनंतकुमार बलसिंगआप्पा कल्याणी, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, मुरुड, जिल्हा लातूर | पंचायत समिती (प्रत्येक विभागातील पहिली) |
| ३ | १. श्री. बी. टी कदम, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, परभणी.<br>२. श्री. एस. जी. ताटे, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र जालना. | पंचायत समिती ( अनुसूचित क्षेत्रातील राज्यातून प्रथम आलेल्या ३ ) |

| अ.क्र. | पडताळणी पथकातील सदस्यांची नाव | पडताळणी करावयाच्या पंचायत राज संस्था |
|---|---|---|
| ४ | १. श्री. सारंग शरदराव पाटील, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती, जिल्हा अमरावती.<br>२. श्री. विजय विठ्ठलराव सोनारे, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, हनुमाननगर, जिल्हा नागपूर. | ग्रामपंचायत (पुणे विभाग) |
| ५ | १. श्रीमती सध्या जगताप, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र मांजरी फार्म, पुणे.<br>२. श्रीमती प्रांजल शिंदे, व्याख्याता, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र मांजरी फार्म, पुणे. | ग्रामपंचायत (कोकण विभाग) |
| ६ | १. श्री. चंद्रशेखर सुर्याजीराव यादव, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, वर्ये, जिल्हा सातारा.<br>२. श्री. रमाकांत विनायकराव गरड, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र,गौडगाव, ता. बार्शी, जिल्हा सोलापूर. | ग्रामपंचायत (नाशिक विभाग) |
| ७ | १. श्री. अविनाश नरेंद्र गरपल्लीवार, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, मूल, ता. मूल, जिल्हा चंद्रपूर.<br>२. श्री. अश्विन मोतीराम आडे, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, पुसद, ता. पुसद, जिल्हा यवतमाळ. | ग्रामपंचायत ( औरंगाबाद विभाग) |
| ८ | १. श्री. कृष्णा तुकाराम दोनाडकर, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, ता. डहाणू, जिल्हा ठाणे.<br>२. श्री. नागेश्वर संख्ये, व्याखाता,ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, ता. डहाणू, जिल्हा ठाणे. | ग्रामपंचायत ( अमरावती विभाग) |
| ९ | १. श्री. अजय देवमल झाडोकर, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, खामगाव, जिल्हा बुलढाणा.<br>२. श्री. किशोर सिताराम झोपे, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, खिरोदा, ता. रावेर, जिल्हा जळगाव. | ग्रामपंचायत (नागपूर विभाग) |
| १० | १. श्री. चद्रकांत दत्तात्रय मोरे, प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर<br>२. श्री. धनंजय पाटील, प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, ता. भुदरगड, जि. कोल्हापूर | ग्रामपंचायत (अनुसूचित क्षेत्रातील राज्यातून प्रथम आलेल्या ६ ) |

२. प्रत्येक पडताळणी समितीने आपल्याला नेमून दिलेल्या पंचायत राज संस्थांमध्ये २ दिवस पूर्णवेळ थांबून प्रत्यक्ष क्षेत्रिय स्तरावर भेटी देऊन पडताळणीचे काम पूर्ण करावयाचे आहे. पंचायत राज

संस्थांच्या पडताळणीच्या दिवशी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी उपस्थित राहून राज्यस्तरीय पडताळणी समितीस माहिती देऊन सहकार्य करावे. त्या दृष्टीने मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना सूचना द्याव्यात. तसेच विभागीय आयुक्तांनी विभागीय स्तरावरील पडताळणी केलेले पंचायत राज संस्थाचे परिपूर्ण प्रस्ताव राज्यस्तरीय पडताळणी समितीसही उपलब्ध करुन द्यावेत.

३. पडताळणी पथकाने दिनांक १७ डिसेंबर, २०१४ पासून पडताळणी सुरु करुन दिनांक २९ डिसेंबर, २०१४ पर्यंत पडताळणी पूर्ण करावयाची आहे. पडताळणी पथकाने पडताळणी अहवाल शासनाकडे दिनांक ३१ डिसेंबर, २०१४ पूर्वी सादर करावयाचा आहे.

४. राज्यस्तरीय पडताळणी समितीसाठी होणारा खर्च केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार पंचायत सबलीकरण व उत्तरदायित्व प्रोत्साहन योजनेअंतर्गत महासंचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, पुणे यांच्याकडे अधिनस्त ठेवलेल्या निधीतून करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१६१४३७३२४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shakuntala Ramesh Sable

Digitally signed by Shakuntala Ramesh Sable
DN: CN = Shakuntala Ramesh Sable, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am approving this document
Date: 2014.12.16 16:28:14 +05'30'

**श. र. साबळे**
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
४) मा. विधानसभा/ मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)
५) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
६) मा. प्रधान सचिव (जलसंधारण).
७) विभागीय आयुक्त (सर्व).
८) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधनी, बाणेर रोड, पुणे.
९) उप सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता).

१०) उप सचिव (संग्राम कक्ष), ग्राम विकास विभाग, मुंबई.
११) उप सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) उप सचिव (सार्वजनिक आरोग्य), मंत्रालय, मुंबई.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य, राष्ट्रीय ग्रामीण जीवन्नोत्ती अभियान
१४) प्रकल्प संचालक (प्राथमिक शिक्षण परिषद)
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१६) प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र/ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र/ संयुक्त प्रशिक्षण केंद्र (सर्व)
१७) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.